शासकीय कामकाजाचे संगणकीकरण करण्यासाठी सल्ला देण्यासाठी "तज्ञ समिती" गठीत करणेबाबत.....

# महाराष्ट्र शासन

शासन निर्णय क्रमांक :- सीओएम-१०९८/प्र.क्र.५१/९८/३९,
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २० मार्च, १९९९

**शासन निर्णय :-**

शासनाने सन २००० सालापर्यन्त शासकीय कार्यालयांचे संपूर्ण संगणकीकरण करण्याचा धोरणात्मक निर्णय घेतला आहे, त्यासाठी सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखाली "माहिती तंत्रज्ञान संचालनालय" स्थापन करण्यात आले आहे. संगणकीकरणाबाबत विविध विभाग/कार्यालयांकडून येणारे प्रस्ताव हे संचालनालयामार्फत व "उच्चाधिकार समितीच्या कार्यकारी समिती" पुढे सादर करण्यात येतात. तत्पूर्वी अशा प्रस्तावांची तांत्रिक दृष्टीने तपासणी होणे आवश्यक असल्याने सुकाणु समितीच्या दिनांक ७ मार्च १९९८ रोजी झालेल्या बैठकीत "तज्ञ समिती" स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. या तज्ञ समितीची रचना खालील प्रमाणे आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | संचालक व पदसिध्द उप सचिव, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय | निमंत्रक |
| २) | राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्राचे मुंबई येथील प्रभारी अधिकारी | सदस्य |
| ३) | नॅशनल सेंटर फॉर सॉफ्टवेअर टेक्नॉलॉजी, मुंबई यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ४) | इंडियन इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ५) | व्ही.जे.टी.आय., मुंबई यांचे प्रतिनिधी | सदस्य |

२. सदरहू समितीच्या प्रत्येक महिन्याला दोन पूर्णवेळ बैठका होतील. उपरोक्त पाच संस्थांपैकी 'माहिती तंत्रज्ञान संचालनालय' व 'राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र' चे प्रतिनिधी हे अनुक्रमे राज्य शासन व केंद्र शासनाचे प्रतिनिधित्व या समितीत करीत असल्याने त्यांना वगळून इतर तिन्ही संस्थांना विविध विभागांच्या प्रस्तावांची तांत्रीक दृष्ट्या छाननी करण्यासाठी या कामाचा मोबदला म्हणुन प्रत्येक बैठकी मागे प्रत्येक संस्थेस रु.४,०००/- इतके सेवाशुल्क देण्यास शासन मंजूरी देत आहे.

३. उपरोक्त प्रयोजनावर होणारा खर्च हा माहिती तंत्रज्ञान संचालनालयाच्या मंजूर अनुदानातून मागणी क्रमांक ए-५, २०५२-सेक्रेटरिएट-सर्वसाधारण सेवा,०९० सेक्रेटरिएट, (९) माहिती तंत्रज्ञान संचालनालय, ५ कार्यालयिन खर्च

..........२/-

राच-४९७५ (५००-३-९९) ३ GR-20020417163049 026-0104.

(२०५२ ०४७३) या लेखाशीर्षाखाली त्या त्या वर्षातंर्गत उपलब्ध होणा-या अनुदानातून भागविण्यात येईल.

हा शासन निर्णय वित्तविभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक-१२७२/व्यय-४, दिनांक १७/९/१९९८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे,

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(राधेश्याम मोपलवार)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
अध्यक्ष, राज्य माहिती तंत्रज्ञान कार्यगट, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा), मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद), मुंबई,
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/लेखाकोष भवन, वांद्रे (पूर्व ), मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव,
प्राचार्य व सचिव, वीरमाता जिजाबाई टेक्निकल इन्स्टिट्यूट, माटुंगा, मुंबई-४०००१९,
संचालक आणि प्राचार्य, इंडीयन इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, पवई, मुंबई-४०००७६,
संचालक, नॅशनल सेंटर फॉर सॉफ्टवेअर टेक्नॉलॉजी, गुलमोहर क्रॉस रोड,जुहू, मुंबई,
महासंचालक, राष्ट्रीय सूचना विज्ञान केन्द्र, सी.जी.ओ. कॉम्पलेक्स, नवी दिल्ली,
वित्त विभाग, (व्यय-४), मंत्रालय, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती (२ प्रती)

* पत्राने.

Hdd.Tech.Com.pk-51

———×———

GR-200204171630498000-0104

रच १६/७५ (५००-३-९९) ९३१